## कल्पनेंतील नावीन्य

कुसुमाग्रजाची कल्पकता भव्य आहे. तिच्यात नावीन्याचें तेज झळाळत आहे. ती बहुविध रूपें धारण करूं शकते. आधुनिक युगातील एक चमत्कार म्हणजे जगाच्या कोनाकोपऱ्यातील वृत्तें व गीतें ऐकविणारा रेडिओ. त्याच्या 'आकाशित लहरी' वरून काय काय कानीं पडतें हें सांगताना कवि म्हणतो, "दूरदूरचीं ऐकिव नगरें। अज्ञाताच्या अथांगतें-तुन। लुटून दौलत भरून तारवें। येत पऱ्या या दिर्हे उभारुन। सान दिव्याचें छोटें बंदर। सुवर्णनौका तिथें विसावुन। येत किनाऱ्यावरील घेउन भरलेले घट शिरीं॥" रेडिओंतील ध्वनींच्या लहरी म्हणजे पऱ्या आहेत आणि त्या देशोदेशींच्या दौलतीनें भरलेल्या घागरी डोक्यावर घेऊन घरोघर येत आहेत अशी मनोहर कल्पना कवीनें केली आहे. रेडियोवरून युद्धाच्या वार्ता येतात, त्यांना उद्देशून कवि म्हणतो, "पुलकित येती कुणी अभिकण। ज्यात उद्यांचें भरे रणांगण। परि अवघ्याची एक मनीषा-नक्षत्राच्या निळ्या पथातुन। व्योमनदीच्या जलात न्हाउन। चंद्रकरांना वाट विचारित। करावयाला बोधन रंजन। यावें माझ्या घरीं। आल्या आकाशित लहरी!"

## उत्प्रेक्षांची माला

रेडियोसारखा नव्यातला नवा विषय ज्या कवीच्या कल्पकतेला स्फूर्ति पुरवू शकतो, त्याला ताजमहालासारखें अमर सौंदर्याचें प्रतीक हा काव्याचा विषय का न वाटेल? त्या प्रेमगर्भ व सौंदर्य-सिंचित कलाकृतीवर आपल्या कल्पनेची रुजी घालण्यात कैक कवींची प्रतिभा रमली आहे-थकलीहि आहे. कुसुमाग्रज आपल्या कल्पनेच्या ताना घेऊन त्या कलामूर्तीचें गुण गान पुढील उत्प्रेक्षांनी करतात, "वर पूर्ण चंद्रमा …री मायाजाल। वसुधेच्या वदनीं लहरे हास्य सलील। तें समूर्त होउन

तीरावर यमुनेच्या । हिमशुभ्र उभा हा सगमावर विशाल ॥ काव्य मनोहर, हो रचनेंत बहार । यमकापरि गमती भव्य समान मिनार । वर विहग कल्पना कलानंद चेदोष । ताळें समाधिस्थ हो पण कारुण्य अपार ॥ वीं, प्रजाहाच्या अयोग या कासारीं । प्रहनक्षत्राचीं पुल्लीं वमलें सारीं । या भू पद्माच्या एक पाकळी वरती । हा यॆंब दवाचा विल्से विमल रुपेरी ॥ "

हा शुभ्र ताजमहाल म्हणजे पृथ्वीचें हास्य आहे कीं सृष्टीचें काव्य आहे कीं कमळावरील दवबिंदु आहे ? अशा उत्प्रेक्षामागून उत्प्रेक्षा करून कवीला शेवटीं असा विचार सुचतो कीं, विलासी शहाजहाननें किती 'असत्य प्रणय' केले असतील आणि आपल्या 'हीन देहलालसे 'साठीं कैक अबलावर अत्याचार केले असतील ?

नाशिककडील द्राक्षाच्या बागाचें वर्णन कवीनें 'मायदेशचा वारा'-मध्यें केलें आहे, तें कल्पनामधुर आहे. हिरवीं वस्त्रें नेसलेल्या व गळ्यात मोत्याचे हार घातलेल्या पऱ्याप्रमाणें द्राक्षाच्या वेली दिसतात अशी उत्प्रेक्षा करून कवि म्हणतो, " द्राक्षाचे बहरत बाग मनोहर जेथें । त्या सुनीत वेली राग पऱ्याची गमते । लेऊन उभ्या जणु हिरव्या नव वसनातें । कटिकठावरती वरती मौक्तिकहारा । हा काय माझिया मायदेशचा वारा ॥" तसेच पानमळे. त्याचें चित्र कवीनें पुढीलप्रमाणें रेखाटलें आहे-" ते नागवेलिचे मांडव शीतल शांत । विश्रांतिच जेथें झालेली विश्रांत । विहिरीवर नादेल सुरेल जीवनगीत । काळींत वाहती सथ रुपेरी धारा । हा काय माझिया मायदेशचा वारा ! "

विजेवर चालणारी व 'पोलादी पथ' तुडविणारी आगगाडी वेगानें धावत असलेली पाहून कवीच्या मनात ज्या कल्पना उसळतात, त्या 'वेगवती 'मध्यें त्यानें पुढीलप्रमाणें मांडल्या आहेत—" कुद्ध काय हें,

तुफान धावत । मदाव जल्दीच्या लाटावर, । तडितेचा कडकडतो आसुड दुभगुनी तिमिरान्वित अंबर ! " समुद्राच्या लाटा व विजेचे आसूड हीं उग्र दृश्यें कुसुमाग्रजाचे लाडके विषय दिसतात.

## उपहासाची तीक्ष्णता

युद्धातील भीषणता व क्रूरता याचें वर्णन उपरोधाचा आश्रय करून कवि 'फेरीवाला' या कवितेंत करतो फेरीवाला आनंदानें हाका देत म्हणतो, 'अमोल माझा माल, नको धन । रक्तमास हें स्वस्त चाललें । खुशाल या लुटण्याला ! आला आला फेरीवाला ! ॥ हा घट देला, यातिल शोणित । मेलें तरि अद्याप उधाणत । उमद्या युवकाचें हो जीवित । रणांगणावर पिळून त्याचा । घट ताजा हा भरला । आला आला फेरीवाला ॥' तरुण मर्दांचें रक्त वाया चाललें ! तसेंच कोमल अबलाच्या डोळ्यातील अश्रु ! " कुपींत या भरलें जल कोमल । अगणित अबलाच्या नेत्रातिल ॥ "

बॉंब हल्ल्यात बेचिराख झालेल्या घराघरात प्रेमळ जोडप्याची राख झाली ! " मजुषेत या राख मनोहर । उदात्त सोज्ज्वळ नैतिक नागर ! आग बरसता दुर्वी घरावर । मिठ्या मारुनी गळ्यांत जळले । त्याचा मिश्रित काट; । आला आला फेरीवाला ॥ सहज बोट रांगेतुन सारा । गृह? याचा गोड उद्गारा । गुतुन राहे आत बिचारा । अदग्ध आशाचे चाळे पण । लागति अजुनी कराला ! आला आला फेरीवाला ! "

आणि युद्धाच्या संहारक वृत्तीचा दुष्टपणा तीव्रतेनें दाखविण्यासाठीं तरुणाचें रक्त व अबलाचे अश्रु याच्या जोडीला कवीनें बालकाच्या ललाटरेषाहि आणल्या आहेत. " जुनावट अथवा प्रौढ नको का ? । ही घ्या दुसरी सदुक देता । बाळजिवाच्या ललाटरेखा । फुलण्यापूर्वी फुटलेल्या हा मिळतो माल कुणाला ? । आला आला फेरीवाला ! ॥ " यापेक्षा

कोणत्या कडक शब्दांनीं या संहारक शक्तींचा पाडावीपणा रंगावितां येईल हिंदुस्थानची फाळणी झाली आणि मानवांतील पशुता मोकाट सुटलं वापलांडग्यांना लाजविणारे अत्याचार बंधुबंधूंनीं केले. स्त्री पाहिली नाहं मूल पाहिलें नाहीं, सर्वांची सरसेहोलपट झाली. त्या भीषणतेचें स्पष्ट चि दावलेल्या रागानें व कोंडलेल्या चिडीनें कवीनें येथें काढलें असावें.

'सैगल' या चित्रपट-नटाचा गौरव करतांना "घडिभर जागव रे अमुची अशीच मानवता' असें ते म्हणतात. "अशीच मानवता" जाग वणारे स्फूर्तिशाली व ओजस्वी कवि ते स्वतः आहेत. यापुढें त्यांच्या प्रति भेचे नवेनवे पैलू दृष्टीस पडतील अशी महाराष्ट्रीय रसिकांची अपेक्ष आहे. म्हणून कवि बोरकरांच्या सुरांत सूर मिसळून ते रसिक विनवितात "नव्यानें गा रे कुसुमाग्रजा !"

# प्रमुख संदर्भ-ग्रंथ


१. महाराष्ट्र सारस्वत–वि. ल. भावे

२. मराठी वाङ्मयाचा इतिहास–ल. रा. पांगारकर

३. मराठी साहित्याचें समालोचन–वि. सि. सरवटे

४. अर्वाचीन मराठी साहित्य–वि. पा. नेने

५. अर्वाचीन मराठी वाङ्मय सेवक–ग. द. खानोलकर

६. पाच संत कवि–श. गो. तुळपुळे

७. स्वभाव लेखन–पु. ग. सहस्रबुद्धे

८. लघुकथालेखन–ना. सी. फडके

९. हास्य विनोद-मीमांसा–न. चिं. केळकर

१०. केळकर–चरित्र आणि वाङ्मय–मा. का. देशपांडे

११. मुक्तात्म्यापासून प्रमद्वरेपर्यंत–रा. श. वाळिंबे

१२. आधुनिक कवि–पंचक–ग. त्र्य. माडखोलकर

१३. मराठी साहित्याची रूपरेषा–वि. पा. दांडेकर

१४. मराठी वाङ्मयाचा परामर्श–ग. भा. निरंतर

१५. मराठी ग्रंथ–सूचि–श. ग. दाते